


## अर्थशास्त्राचा नोबेल पुरस्कार जाहीर

०१. ब्रिटिशवंशीय अर्थतज्ज्ञ ऑलिव्हर हार्ट आणि फिनलँडचे बेंट हॉमस्ट्रॉम यांना प्रतिष्ठेचा अर्थशास्त्रातील 'नोबेल' पुरस्कार जाहीर करण्यात आला. हार्ट आणि हॉमस्ट्रॉंग यांच्या अर्थशास्त्रातील कॉन्ट्रॅक्ट थिअरीची दखल घेऊन हा पुरस्कार जाहीर करण्यात आला आहे.

०२. त्यांच्या संशोधनामुळे विमा पॉलिसी, अतिवरिष्ठ पदांवरील व्यक्तींचे वेतन इतकेच नव्हे, तर तुरुंग व्यवस्थापन सुकर झाले आहे. विवादित हितसंबंध सोडविण्यासाठी या करार सिद्धांताचा उपयोग होऊ शकतो. तसेच दिवाळखोरीशी संबंधित घटनात्मक आणि राजकीय धोरणांचा पाया यांच्या संशोधनामुळे घातला गेला.

०३. कराराचे स्वरूप, त्याची व्याप्ती विशद करून त्याचा आकृतिबंध समोर मांडण्याचे काम 'कॉंट्रॅक्ट थिअरी' करते. कराराच्या विविध पद्धती व आकृतिबंध का असतात हे उलगडून सांगणे हा या थिअरीचा उद्देश आहे. कामाच्या स्वरूपानुसार वेतन, सार्वजनिक क्षेत्रातील कंपन्यांचे खासगीकरण अशा अनेक गोष्टींसाठी या सिद्धांताचा उपयोग होतो. सर्व व्यवस्थेतील संतुलन कायम राखण्याचे काम या दोघांच्या सिद्धांतामुळे झाले.

०४. नोबेल पुरस्काराची सुरूवात १८९५ साली झाली पण अर्थशास्त्रातील पुरस्कार देण्याची सुरूवात १९६९ साली करण्यात आली. गतवर्षी हा पुरस्कार ब्रिटनचे अर्थतज्ज्ञ अँगस डिटॉन यांना प्रदान करण्यात आला होता.

०५. आठ दशलक्ष स्वीडिश क्रोनर (९, ३६ हजार डॉलर किंवा ८, ३४ हजार युरो) व पदक असे पुरस्काराचे स्वरूप आहे. १० डिसेंबर रोजी पुरस्कार प्रदान करण्यात येणार आहे.

## 'शकुंतला' रेल्वे केंद्र सरकारच्या ताब्यात

०१. शंभरी पार केलेल्या व आजही ब्रिटीश कंपनी 'क्लिक निक्सन' च्या ताब्यात असलेल्या यवतमाळ-मूर्तीजापूर, मूर्तीजापूर-अचलपूर या 'शकुंतला' नावाने परिचित नॅरोगेज रेल्वे मार्गासंबंधीचा ब्रिटिश कंपनीशी असलेला करार अखेर संपुष्टात येणार असून हा मार्ग आता केंद्र सरकारच्या ताब्यात येऊा त्याचे ब्रॉडगेजमध्ये रूपांतर करण्याची प्रक्रिया सुरू झाली आहे.

०२. देशात 'शकुंतला' नावाने ओळखल्या जाणाऱ्या या विदर्भातच असलेल्या रेल्वे मार्गांपैकी आर्वी-पुलगाव रेल्वे बंद झाले आहे. उर्वरित २ नॅरोगेज रेल्वेमार्गाचे ब्रॉडग्रेजमध्ये रूपांतर करण्यास प्रयत्नानंतर केंद्र सरकारने मान्यता दिली.

०३. 'शकुंतला' चे ब्रॉडगेजमध्ये रूपांतर होण्यासाठी एक याचिकासुध्दा संसदेच्या याचिका समितीसमोर दाखल झाली होती. आता यवतमाळ-मूर्तीजापूर आणि मूर्तीजापूर-अचलपूर हे दोन्ही नॅरोगेज मार्ग ब्रॉडग्रेजमध्ये बदलण्याच्या प्रस्तावाला मान्यता मिळाली आहे.

०४. १९१६ मध्ये क्लिक निक्सन या ब्रिटिश कंपनीने या तीन नॅरोगेज रेल्वे सुरू केल्या होत्या. देश ब्रिटिशांच्या जोखडातून मुक्त झाल्यावरही देशातील या तीन रेल्वे गाडया आजही याच कंपनीच्या ताब्यात आहेत.

०५. यवतमाळ-मूर्तीजापूर हा ११७ कि.मी लांबीचा आणि मूर्तीजापूर-अचलपूर हा १८८ कि.मी लांबीचा रेल्वेमार्ग ब्रिटिश कंपनीच्या ताब्यातून काढून केंद्र सरकारच्या ताब्यात येण्याची ही घटना दीर्घ संघर्षांचा परिणाम ठरणार आहे. या मार्गावर कोळशाच्या इंजिनवर चालणाऱ्या शंकुतला १९९४ नंतर डिझेल इंजिनवर चालू लागल्या.

## रिलायन्स जियोचे जागतिक रेकॉर्ड

०१. दूरसंचार कंपनी रिलायन्स जियोने नवे रेकॉर्ड केले असून, एकाच महिन्यात या कंपनीने नवे एक कोटी साठ लाख ग्राहक जोडले आहेत. एवढ्या गतीने ग्राहक जोडण्यात कंपनीने फेसबुक आणि व्हॉट्सअॅपलाही मागे टाकले आहे.

०२. मुकेश अंबानी यांच्या नेतृत्वातील रिलायन्स जियोने ४-जी सेवेने ही नवी योजना ५ सप्टेंबर रोजी सुरू केली. जियोची सध्या वेलकम ऑफर सुरू असून, ती ३१ डिसेंबरपर्यंत आहे. कंपनीने आगामी काळात दहा कोटी ग्राहकांचे लक्ष्य ठेवले आहे.

# नेमबाज जितू रायला चॅम्पियन्स करंडक पुरस्कार

०१. भारताचा अव्वल नेमबाज जितू रायची आंतरराष्ट्रीय नेमबाजी महासंघाच्या चॅम्पियन्स करंडक पुरस्कारासाठी निवड झाली. १० मीटर एअर पिस्तूल प्रकारात जितूने सर्बियाच्या दामीर मिकेकवर मात करत पुरस्कारावर नाव कोरले. पुरस्काराबरोबर जितूला ५००० युरो बक्षीस रकमेने गौरवण्यात येणार आहे. रायफल प्रकारात रशियाच्या सर्जेय कामेनस्कियची पुरस्कारासाठी निवड झाली.

०२. चॅम्पियन्स करंडकासाठी विश्वचषक अंतिम फेरीच्या अखेर लढती आयोजित करण्यात येतात. बोल्गाना, इटली येथे आयोजित लढतीत जितूने २९.६ गुणांसह सर्बियाच्या प्रतिस्पर्ध्याला नमवले. विश्वचषकाच्या अंतिम फेरीसाठी पात्र ठरलेले सर्व स्पर्धक चॅम्पियन्स करंडकाची लढत खेळू शकतात.

०३. १० मीटर एअर रायफल आणि १० मीटर एअर पिस्तूल यापैकी एकाची निवड त्यांना करायची असते. चाळणी तत्त्वावर स्पर्धा होते. चार फटक्यांनंतर सगळ्यात कमी गुणसंख्या असलेला नेमबाज बाहेर पडतो. अंतिम दोन नेमबाजांमध्ये स्पर्धा होते. त्यांचे गुण शून्य होतात आणि तीन स्वतंत्र नेमद्वारे विजेत्याची निवड होते.

# स्वयंचलित इन्सुलिन नियंत्रण यंत्राला अमेरिकेत मान्यता

०१. अमेरिकेत स्वयंचलित इन्सुलिन नियंत्रण यंत्र तयार करण्यात आले असून, त्याला कृत्रिम स्वादुपिंड असे नाव देण्यात आले आहे. त्याच्या मदतीने रक्तातील शर्करेचे निरीक्षण करून वेळीच इन्सुलिन शरीरात सोडता येते. या यंत्राला अमेरिकेने मान्यता दिली आहे.

०२. मानवी स्वादुपिंड नैसर्गिकरीत्या इन्सुलिन पुरवण्याचे काम करीत असते. हा पुरवठा संथगतीने होत असतो. मधुमेह असलेल्या रुग्णात इन्सुलिन तयार करण्याची क्षमता कमी झालेली असते.

०३. मिनीमेड ६७० जी हायब्रीड ही बंदिस्त प्रणाली असून, त्यातून रक्तशर्करेवर लक्ष ठेवले जाते व इन्सुलिनचा डोस दिला जातो. १४ वर्षे व त्यापुढील वयोगटातील टाइप-१ मधुमेहाच्या रुग्णांसाठी हे यंत्र अमेरिकेच्या अन्न व औषध प्रशासनाने मंजूर केले असून, टाइप-१ मधुमेहाच्या रुग्णांना त्यामुळे दिलासा मिळणार आहे.

०४. मिनीमेड ६७० जी हायब्रीड हे कृत्रिम स्वादुपिंड असून, त्यात इन्सुलिनची योग्य पातळी राखली जाते. बाहेरून इन्सुलिन द्यावे लागत नाही. ग्लुकोजची पातळी मोजून आपोआप इन्सुलिन दिले जाते. शरीराला संवेदक लावला जातो व त्यातून ग्लुकोज पातळी मोजली जाते. इन्सुलिनचा पंप शरीराला लावलेला असतो. इन्सुलिन कमी होताच त्यातून कॅथेटरच्या मार्गाने इन्सुलिन सोडले जाते.
०५. टाइप-१ मधुमेहावर हे उपकरण उपयोगी असून, त्यात आहार व व्यायामाची जोड देणे आवश्यक असते. हे यंत्र १४ वर्षे वयापासूनच्या पुढील लोकांना उपयुक्त आहे.

# जवानांना साथ देणाऱ्या प्राण्यांनाही विशेष पदके

०१. सीमेवर सामान वाहून नेणे आणि गस्त घालण्यासारख्या महत्त्वाच्या कामांमध्ये जवानांबरोबर खांद्याला खांदा लाऊन चालणाऱ्या प्राण्यांनाही पहिल्यांदाच विशेष पदके देऊन गौरविण्यात येणार आहे.

०२. भारत-चीन सीमेवर तैनात इंडो-तिबेट सीमा पोलिस (आयटीबीपी) दलाने हा निर्णय घेतला असून, त्यांच्यामार्फत 'ऍनिमल ट्रान्सपोर्ट' आणि 'के 9 (श्वान)' ही पदके दिली जाणार आहेत. यासाठी दलाने 'थंडरबोल्ट' या घोड्याची आणि 'सोफिया' या मादी श्वानाची निवड केली आहे. आगामी ५५व्या वार्षिक कार्यक्रमादरम्यान या दोन्ही प्राण्यांना विशेष पदकाने सन्मानित केले जाणार आहे.

०३. देशातील नक्षलविरोधी मोहिमांसाठी आणि पायी गस्त घालण्यासारख्या कठीण कामांसाठी पहिल्यांदा बेल्जियम मालीनोइस जातीच्या कुत्र्यांचा दलात समावेश करण्याचे श्रेय आयटीबीपीकडे जाते. त्याचवेळी या दलाकडे पारंपरिक पद्धतीने घोडी, खेचर आणि छोट्या घोड्यांची एक मजबूत प्राणी वाहतूक संस्था आहे, जी ३४८८ किलोमीटर लांब चीन सीमेवर अतिशय उंच भागात पहारा देण्यासाठी जवानांना मदत करते.

०४. यापूर्वी या प्राण्यांच्या उत्कृष्ट कामासाठी दलप्रमुख किंवा अन्य अधिकाऱ्यांना नियमित प्रशस्तिपत्र देऊन सन्मानित केले जात होते. मात्र, आता पहिल्यांदाच एखाद्या सुरक्षा दलाने यासंबंधी विशेष पदक देण्याचा आदेश काढला असल्याची माहिती एका अधिकाऱ्याने दिली.